आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१ -२२ या आर्थिक वर्षात अनुदानित आश्रमशाळा या योजनेतंर्गत सहायक अनुदान वितरीत करणेबाबत.
(लेखाशीर्ष २२२५ एफ १२९, ३१-सहाय्यक अनुदाने-वेतनेतर)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/ प्र.क्र. ०२ / कार्यासन-६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक:-११ नोव्हेंबर, २०२१.**

वाचा -

१. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८ / अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२. आदिवासी विकास विभाग, नस्ती क्र.अआशा-२०२१/प्र.क्र.८१/का-११.

**प्रस्तावना :-**

आदिवासी विकास विभागांतर्गत अनुदानित आश्रमशाळांना शासनामार्फत परिपोषण अनुदान, इमारत भाडे अनुदान तसेच आकस्मिक अनुदान देण्यात येते. या अनुषंगाने आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या वर्षात मागणी क्र.टी-५ मधील (०१) (७३) स्वयंसेवी संस्थांना आश्रमशाळा व मुलगोद्योत्तर आश्रमशाळा चालविण्यासाठी सहाय्यक अनुदाने (कार्यक्रम खर्च) (२२२५ एफ१२९), ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) खाली रू.४५०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित आहे. अनुदानित आश्रमशाळांच्या परिपोषण अनुदानाकरीता निधी वितरणाचा प्रस्तावावर वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी विकास विभागाच्या मागणी क्रमांक टी-५ अंतर्गत २२२५ - अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या मुख्य लेखाशीर्षातर्गत (०१) (७३)- स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या अनुदानित आश्रमशाळा या योजनेतंर्गत (२२२५ एफ १२९), बाब क्र.३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) याखाली वित्त विभागाने उपलब्ध करून दिलेल्या निधी वितरण मर्यादेत रु.१३५००.०० लाख (अक्षरी रुपये एकशे पस्तीस कोटी फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी तथा आयुक्त, आदिवासी विकास नाशिक यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर वितरीत निधीचा विनियोग अनुदानित आश्रमशाळांच्या सन २०२०-२१ या वर्षातील अनुदानाच्या प्रलंबित दायित्वासाठी व सन २०२१-२२ या वर्षातील अनुदानाचा प्रथम हप्ता अदायगीसाठी करण्यात यावा. वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाय योजना करुन खर्च करावा.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व अनौपचारिक संदर्भ क्र.९१४/व्यय-१४, दि.२७.१०.२०२१ अन्वये दर्शविलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११०२१७३९५२२६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, pseudonym=4D88F77C99929CC895AC64CF186BB11E7252442D, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2021.11.11 17:34:31 +05'30'

**(किरण कि.पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. महालेखापाल (लेखापरिक्षण) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
६. उपसचिव / कक्ष अधिकारी (का-११), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग (कार्यासन व्यय-१४ व अर्थ-१९), मंत्रालय, मुंबई.
१०. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
११. निवड नस्ती (का-६).